जकार्ता, इंडोनेशिया येथे पार पडलेल्या एशियन गेम्स- २०१८ मध्ये महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १७१८/प्र.क्र.१३१/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १६ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा:**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : क्रीडायो २०१२ /प्र.क्र १५८/१२/ क्रीयुसे - २; दि.०५.०२.२०१४.

**प्रस्तावना-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ऑलिंपिक,राष्ट्रकूल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्या खेळाडूंना रोख पारितोषिके देवून गौरविण्याची योजना कार्यन्वित आहे. जकार्ता, इंडोनेशिया येथे पार पडलेल्या आशियाई क्रीडा स्पर्धा (एशियन गेम्स) - २०१८ मध्ये पदक प्राप्त करुन महाराष्ट्र राज्याचे नाव संपूर्ण जगात उज्जवल केलेल्या खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शक यांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जकार्ता, इंडोनेशिया येथे पार पडलेल्या आशियाई क्रीडा स्पर्धा (एशियन गेम्स) - २०१८ मध्ये खालील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेली रक्कम विशेष रोख पारितोषिक म्हणून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | खेळाडूचे नांव | खेळ प्रकार | प्राप्त पदक | रोख पारितोषिक रक्कम (रु. लाखात) | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | खेळाडू | मार्गदर्शक |
| १. | श्रीम. राही सरनोबत | शूटिंग (२५ मी. पिस्तुल) | सुवर्ण | ५०.०० | १२.०० |
| २. | श्री. दत्तू भोकनळ | नौकानय | सुवर्ण | ५०.०० | १२.०० |
| ३. | कु. सायली केरीपाळे | कबड्डी | रौप्य | ३०.०० | ०७.०० |
| ४. | श्रीम. सोनाली शिंगटे | कबड्डी | रौप्य | ३०.०० | ०७.०० |
| ५. | श्रीम. श्वेता शेरवेगार | सेलींग | रौप्य | ३०.०० | ०७.०० |
| ६. | श्रीम. वर्षा गौतम | सेलींग | रौप्य | ३०.०० | ०७.०० |
| ७. | श्री. रिशांक देवाडिगा | कबड्डी | कांस्य | २०.०० | ०५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८. | श्री. गिरीश इरनक | कबड्डी | कांस्य | २०.०० | ०५.०० |
| ९. | श्रीम. हिना सिध्दू | शूटिंग (१० मी. पिस्तुल) | कांस्य | २०.०० | ०५.०० |
| १०. | श्री. महेश मानगावकर | स्क्वॅश | कांस्य | २०.०० | ०५.०० |
| | | | **एकूण** | ३००.०० | ७२.०० |
| | | | | **३७२.००** | |

उपरोक्त नुसार एकूण रु. ३७२.०० लक्ष (रुपये तीन कोटी बाहत्तर लाख फक्त) इतकी रक्कम आयुक्त, क्रिडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९) (०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४ ५३२१)-५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.७६९/व्यय-५, दि.०१/१०/२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१७४०५८२१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.19 18:07:25 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा ) यांचे खाजगी सचिव.
३) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
९) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
१०) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
११) लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे ( संचालनालयामार्फत )
१२) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. ( संचालनालयामार्फत )
१३) निवडनस्ती, क्रीयुसे-२.